**खरीप पणन हंगाम २०१९-२० तसेच रबी पणन हंगाम २०२०-२१ मध्ये खरेदी केलेल्या धानाच्या भरडाईबाबत अतिरिक्त सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः धानभ-१२१९/प्र.क्र.११५/ना.पु.२९**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २३ डिसेंबर, २०१९.

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांक : खरेदी-१११५/प्र.क्र.१७/नापु-२९, दिनांक १४/०१/२०१६.
२) शासन शुध्दिपत्रक क्रमांक : क्र.१०१४/२८/प्र.क्र.१७/नापु-२९, दिनांक ०३/११/२०१७
३) शासन निर्णय क्रमांक खरेदी-१०१९/प्र.क्र.९८/नापु-२९, दिनांक ०९/०९/२०१९
४) शासन परिपत्रक क्रमांक धानभ-१२१९/प्र.क्र.११५/नापु-२९, दिनांक ०८/११/२०१९

**शासन परिपत्रक :-**

खरीप पणन हंगाम २०१९-२० तसेच रबी पणन हंगाम २०२०-२१ करीता किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेअंतर्गत "विकेंद्रित खरेदी योजना" संपूर्ण राज्यात राबविण्याचे संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये निर्देश देण्यात आले आहेत. त्यानुसार सदर योजनेअंतर्गत खरेदी होणाऱ्या धानाची भरडाई खरेदीबरोबरच सुरु करणे आवश्यक आहे. धानाची भरडाई ही अभिकर्ता संस्थेने (दि महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन, मुंबई व महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्यादित, नाशिक) केंद्र शासनाच्या विहित मापदंडानुसार करावयाची आहे.

उपरोक्त योजना सक्षमपणे राबविण्याच्या दृष्टीने खालीलप्रमाणे अतिरिक्त सूचना देण्यात येत आहेत.

त्या अनुषंगाने उपरोक्त परिपत्रकातील परिच्छेद ४ (iii) बाबत नमूद करण्यात येते की, ज्या मिलर्सनी मागील हंगामामध्ये सक्षमरित्या धानाची भरडाई केली असेल ते मिलर्स थकबाकीदार नसतील तर केवळ त्या मिलर्सची मागील वर्षाच्या करारनाम्याचे नुतनीकरण करुन त्यांना धानाच्या भरडाईचे काम देण्याबाबत जिल्हा समन्वय समितीने निर्णय घ्यावयाचा आहे. तसेच, सदर नुतनीकरण करण्याचा निर्णय घेतल्यानंतर मागील वर्षी त्या मिलर्सने दिलेल्या कागदपत्रांव्यतिरिक्त अन्य कागदपत्रांची आवश्यकता असल्यासच अशी कागदपत्रे उपलब्ध करुन घ्यावीत.

तसेच, या परिच्छेदातील "गिरणीच्या नावाचे मागील ३ महिन्यांचे विद्युत देयक" घेण्याबाबत जे नमूद केले आहे. त्याबाबत स्पष्ट करण्यात येते की, सदर अट केवळ मागील वर्षापर्यंत धान भरडाईचे काम करणाऱ्या मिलर्ससाठी लागू राहणार असून यावर्षी ज्या मिलर्सनी नव्याने मिल सुरु केली आहे. त्या मिलर्सच्या बाबतीत इतर अटी व शर्ती पूर्ण होत असतील तर त्यांना धान भरडाईचे काम सुरु करण्याबाबत निर्णय घ्यावा आणि त्यांच्या मिलमध्ये धान भरडाई सुरु झाल्यानंतरच्या कालावधीपासूनचे वीज देयक वीज कंपनीकडून प्राप्त झाल्यानंतर त्या मिलर्सकडून उपलब्ध करुन घ्यावे.

तसेच, याच परिच्छेदात "मागील ३ वर्षांचे Audited Statement" घेण्याबाबत जो उल्लेख केला आहे त्याबाबत स्पष्टता करण्यात येते की, या वर्षी नव्याने धान भरडाईचे काम करणाऱ्या परंतु ज्यांनी याच वर्षामध्ये

नव्याने मिल सुरु केली आहे त्या मिलर्सकडे कोणत्याही परिस्थितीत मागील वर्षाचे Audited Statement उपलब्ध होऊ शकणार नाहीत, असे असल्याने त्या मिलर्सकडून Audited Statement ची अट अनिवार्य करण्यात येऊ नये.

तसेच, परिच्छेद ४ (iv) मध्ये "कोणत्याही परिस्थितीत sortex/ paraboiled प्रकारच्या गिरणींची निवड करण्यात येऊ नये" अशी जी सूचना दिली आहे त्याबाबत स्पष्ट करण्यात येते की, मिलर्सना धान भरडाईचे काम देताना त्या मिलर्सची मिल केवळ sortex अथवा paraboiled याच प्रकारचे काम करत असेल तर त्या मिलर्सना धानाच्या भरडाईचे काम देण्यात येऊ नये. परंतु जर सदर मिलमध्ये sortex अथवा paraboiled यासह धानाच्या भरडाईचे काम देखील करण्यात येत असेल त्या मिलर्सना धानाच्या भरडाईचे काम देण्यात यावे. ही अट जुन्या व नवीन दोन्ही प्रकारच्या मिलर्ससाठी लागू राहील. याबाबत मिलर्सकडून कोणतेही प्रतिज्ञापत्र घेण्याची आवश्यकता नाही.

परिच्छेद क्र. (iv) मधील इतर अटी शर्ती केवळ नव्याने भरडाईचे काम करणाऱ्या मिलर्ससाठी लागू राहतील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९१२२३१७१६२१५६०६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food and Civil Supply, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, serialNumber=ae91c22a99adbafeb91e1127b17cef54d9c48672dc90ac9562ba7f619961cbbb, cn=Satish Shridhar Supe
Date: 2019.12.23 17:28:19 +05'30'

**( स. श्री. सुपे )**

**सह सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**प्रत,**

१. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, कनमुर हाऊस, मुंबई ४०० ००१.
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., आदिवासी विकास भवन, जुना आग्रा रोड, नाशिक ४२२ ००१
३. जिल्हाधिकारी, नागपूर, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर, गडचिरोली, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग
४. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
५. जिल्हा पुरवठा अधिकारी, नागपूर, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर, गडचिरोली, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग
६. सहायक जिल्हा पुरवठा अधिकारी, नागपूर, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर, गडचिरोली, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग

७. सर व्यवस्थापक (महाराष्ट्र), भारतीय अन्न महामंडळ, ५ वा माळा, दत्तपाडा रोड, राजेंद्र नगर, बोरीवली (पूर्व), मुंबई ४०० ०६६
८. उप आयुक्त (पुरवठा), सर्व विभाग

**प्रत माहितीसाठी अग्रेषित**

१. मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/ विधान परिषद
२. सर्व विधान परिषद सदस्य व विधान सभा सदस्य
३. अपर मुख्य सचिव, (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५. प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती)
७. खाजगी सचिव, मा.मंत्री (अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण), मंत्रालय, मुंबई-३२
८. मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची कार्यालये, (प्रत्येकी ५ प्रती)
९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय ६ वा मजला, विधानभवन, मुंबई (१० प्रती)
१०. संचालक, दि महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन, मुंबई
११. संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्यादित, नाशिक
१२. निवडनस्ती/ नापु-२९.